

# पावरा

(आदिवासी समाजातली एक जमात)

नरेश रावताला

●●●

**पावरा/नरेश रावताला**

●●●

**प्रकाशक**

प्रेमदास रावताला

**दिव्या प्रकाशन**

**६२, कैलासनगर, चितोड रोड, धुळे ४२४ ००१ (महाग्र)**

**भ्रमणध्वनी :९२०९९ ७६७१२**

e-mail : divyaprakashan15@gmail.com

●●●

**प्रथमावृत्ती/६ मे २०१५**

●●●

**अक्षरजुळवणी/मुखपृष्ठ व आतील छपाई**

दिव्या मुद्रण सेंटर

६२, कैलासनगर, चितोड रोड, धुळे ४२४ ००१ (महा.)

●●●

**किंमत**

₹२०/- (ई-माध्यमाद्वारे ई-साहित्य प्रतिष्ठानच्या वाचकांसाठी 'पावरा' नि:शुल्क)



"जगणे यालाच म्हणतात...
आजही कैक पिढ्या खपल्या
बुढे बोलून गेले ते बुरे नव्हे,
इथे आजही हे पावरा आपल्या
संस्कृतीतच नांदतात..."

– नरेश रावताला

# अनुक्रम



●●●



# ई–साहित्य प्रतिष्ठानचे मनोगत

जमाना बदलला, दुनिया झपाट्याने बदलते आहे. झटपट बदलणाऱ्या या जगात एखाद्या संस्कृतीचा मृत्यू न व्हावा, हे आमचे अचूक सूचक आहे. संस्कृती बदलते, पण या जमातीचे संस्कार बदलत नाहीत. हे पुस्तक 'पावरा' जमातीच्या संस्कृतीचे दर्शन घडवते. ही जमात कोणती? कशी? काय? याचा परामर्श घेण्याचा हा प्रयास आहे. आदिवासी समाजातली 'पावरा' जमात ही महाराष्ट्र, मध्य प्रदेश व गुजरात यांच्या सीमा भागात राहणारी आदिवासी जमात आहे. पावरा जमातीतील लोक सातपुड्याच्या पायथ्याकडील प्रदेशांत राहतात. नरेश रावताला यांनी संक्षिप्तपणे या जमातीतले लेखक म्हणून आवरत्या भाषेत ही पुस्तिका ई–साहित्य प्रतिष्ठानकडे विनाशुल्क सोपविली आहे. श्री. रावताला यांचे आभारी आहोत.

थोडक्यात, 'पावरा' ही आदिवासी समाजातली एक जमात. या जमातीच्या चाली–रिती निराळ्या. होलिकोत्सव अगर भोंगऱ्या–गुलाल्या बाजार अनोखा प्रकारचा आताशी शिक्षण प्रवाहात येत असलेल्या या जमातीची थोडक्यात आर्थिक प्रगती होऊ पाहते आहे. 'पावरा' पुस्तिकेच्या निमित्ताने लेखकाचे म्हणणे मांडणे जरुरीचे वाटले म्हणून हा अल्पसा प्रयास. आदिम संस्कृतीचा उगम, आर्य–अनार्य यांचा अपवाद वगळता 'पावरा' जमात सातपुड्याच्या गिरीकंदरात पूर्वापार वास्तव्य करुन आहे. जिथे इतिहासाचे धागेदोरे जोडले जात नाहीत, त्या 'पावरा' जमातीची मोघल व ब्रिटीश काळात 'भील' म्हणून पेहचान उदयास आली. जमात अगर जात कुठलाही समाजाची असो. या पुस्तिकेतला काही भाग राज्य शासनाच्या माहिती महासंचनालाच्या २०१४ मधील नंदुरबार जिल्हा माहिती कार्यालयाचे जिल्हा माहिती अधिकारी श्री. रणजित राजपूत यांच्या पुढाकाराने शासनाच्या अखत्यारित प्रकाशित झाला आहे. आणखी भर घालून ही पुस्तिका पूर्ण करण्याचा व इतर समाज संस्कृतीला 'पावरा' जमात काय आहे, हे समजावून सांगण्याचा प्रयत्न झाला आहे. महत्वाचे म्हणजे राज्य शासन या पुस्तिकेतील काही प्रकरणांची दखल घेण्यास पात्र आहे. या जमातीची भाषा बारा कोसांवर बदलते, हे वैशिष्ट्य आहे. वाचक या लिखाणाचे स्वागत करतीलच, अशी अभिलाषा.

–सुनील सामंत

(ई–साहित्य प्रतिष्ठान)

●●●

# लेखक लिहताय्...

आदिवासी समाजातली 'पावरा' जमात ही महाराष्ट्र, मध्य प्रदेश व गुजरात यांच्या सीमा भागात राहणारी आदिवासी जमात आहे. पावरा जमातीतील लोक सातपुड्याच्या पायथ्याकडील प्रदेशांत राहतात. होळीच्या निमित्ताने केल्या जाणाऱ्या गेर नृत्यासाठी पावरा लोक ख्यातनाम आहेत. होळीच्या अगोदर १५ दिवसांपासून गेर नृत्याच्या तयारीस सुरुवात होते. या नृत्यातील लागणारी सामग्री रानातूनच जमा करावी लागते. नृत्यात सहभागी होणारे लोक घर सोडून गावात सराव करायला सोयीच्या मोकळ्या जागेवर जमा होतात व सुमारे १५ दिवस नृत्याचा सराव करतात. या नृत्यात वाजंत्री, देखरेख करणारे, पूजन करणारे, संरक्षण करणारे, नाचणारे अशी माणसे असतात. यात राय, बावा बुद्या, वन्य प्राणी वा काली इत्यादींचा समावेश असतो. एका संघात जवळपास २० ते २५० लोकांचा समूह नाच सादर करतो. एकाच गावातील वा जवळपासच्या अनेक गावांतील लोक अश्या नाचात सहभाग घेतात. होळीच्या निमित्ताने केल्या जाणाऱ्या गेर नृत्यासाठी पावरा लोक प्रख्यात आहेत. या समाजाच्या बारा उपपोट जमाती आहेत. या नृत्यात वाजंत्री, देखरेख करणारे, पूजन करणारे, संरक्षण करणारे, नाचणारे अशी माणसे असतात.

राय हे गेर नृत्यातील नर्तक असतात. त्यांचा पेहरावात दोनवारी साड्यांचे केलेले उपरणे असते. कंबरेखाली एक साडी गोलाकार गुंडाळलेली असते. नर्तकांच्या हातात तलवार व डोक्यावर रंगीत पागोटे असते. यांच्या सोबत साडी नेसलेले स्त्री वेषातील पुरुष असतात. या सर्वांना गेर नृत्यातील शिस्त चोखपणे पाळावी लागते. हत्यारबंद असलेल्या रायांचे गेरनृत्य पाहण्यास मनमोहक असते.

बावा वा बुद्या हे गेर नृत्यातील नर्तक असतात. यांचा पेहराव आकर्षक असतो. डोक्यावर बांबूपासून तयार केलेला टोप असतो. अंगावर पांढऱ्या रंगाने नक्षी वा रेषा काढलेल्या असतात. गळ्यात माळा असतात. कंबरेभोवती दूधीभोपळ्याची फळे बांधलेली असतात. हातात तलवार वा लाकडी बांबूची काठी असते. कंबरेला व पायात घुंगरू बांधलेले असतात. हे घुंगरांच्या ठेक्यावर किंवा ढोलाच्या ठेक्यावर नाचतात. एका तालात नाचणे व घुंगरांचा आवाज यावर या बावा-बुध्यांचे नृत्य पाहण्यासारखे असते. वन्यप्राणी वेषात अस्वल, वाघ इत्यादी प्राणी असतात. यांना नाचण्याचे बंधन नसते, हे लोक लोकांचे मनोरंजन करतात व आपल्या संघाचे रक्षण करतात. चेटकीण (अंधश्रद्धेचा भाग वगळता) प्रत्येक संघात एक काली असते. तोंड व संपूर्ण अंग काळ्या रंगाने रंगवलेला माणूस ही भूमिका करतो. त्याच्या हातात सूप व लाकडी पळी (मोठा चमचा) असतो. ह्यामुळे आपल्या संघाला कोणाची नजर लागत नाही. आपल्या संघाचे रक्षणाची जबाबदारी यांच्यावरसुद्धा असते. आदीवासी समाजातील पावर जमातीच्या काही महत्वपूर्ण मुद्यांवर नरेश रावताला यांनी लिहिलेली ही पुस्तिका त्यांच्या संस्कृतीच्या दृष्टीने मार्गदर्शनपर ठरणारी आहे. या जमातीच्या चाली-रिती, मृतांना पाजली जाणारी मह् फुलांची दारू आदी प्रकार वाद निर्माण करणारे असल्याने ते टाळण्यात आले आहेत. 'इथे मुडदेही दारू पितात' हा भागसुद्धा वगळण्यात आला आहे. सा जमातीत बारा कुळाच्या उपपोट जाती आहेत. त्यात राठवा, बारेला, उरपा, ढापला, रावताला आदींचींचा अंर्तभाव येतो. समाजासह इतर समाजाचे वाचक या पुस्तिकेचे ई-बुकच्या माधमातून स्वागत करतील, ही अपेक्षा.

-नरेश रावताला

६२, कैलासनगर,
चितोड रोड, धुळे ४२४ ००१
nareshrawatala@gmail.com

●●●

आदिवासी संस्कृती ही नावानुसार भारतातच नव्हे, तर जागतिक इतिहासात 'आदि' अर्थात, आरंभाची आहे. जिथे-जिथे इतिहासाचे धागे जुळवायला सबळ पुरावे मिळाले नाहीत, तिथे आदिवासींच्या संस्कृतीवरूनच जुळवाजुळवी करता येते. त्यांच्या राहणीमान आणि प्रगतीवरून इतिहास अधिक प्रामाणिकपणे लिहिता येतो. वसाहतीकरणामुळे आदिवासींच्या जीवनात अनेक बदल झाले आहेत. आपल्या जीवनावर पाश्चात्य सुंस्कृतीचा फार मोठा पगडा बसला आहे. त्यामुळे आपले कपडे, खाणे, पिणे, वागण्याच्या, राहण्याच्या पद्धती बदलणे शहरी वातावरणात नाईलाजाने करावे लागते. आदिवासी संस्कृतीची जी ठळक वैशिष्ट्ये आहेत, तिच्याकडे दुर्लक्ष करून मात्र चालणार नाही. कारण, इतिहासाची ती एक परंपरा आहे आणि त्या पाठीमागे एक विशिष्ट विचारधारा आहे, ती जपून ठेवली गेली पाहिजे. ह्याचा अर्थ आपण भारतीय परंपरेपासून तुटत जावे, असा अजिबात नाही, तर आपल्या आदिवासी जीवनाचे वैशिष्ट्य हे भारतीय परंपरेचे असल्यामुळे ते जिवंत ठेवणेही गरजेचे आहे. कारण, जुन्या गोष्टींची माहिती राखून ठेवण्यातले फायदे अनेक आहेत.

'पावरा' ही आदिवासी समाजातली एक जमात आहे. ब्रिटिश काळापासून या जमातीचे आंग्रेस अर्थात आताच्या महाराष्ट्रात वास्तव्य आहे. पूर्वी मध्य प्रदेश (राजवाडा), गुजरात अन् काहीअंशी राजस्थानच्या इलाख्यात यांचे स्थान होते. त्यामुळे यांच्या भाषेवर त्या-त्या राज्यातील भाषेचा पगडा आहे. स्वतंत्र लिपी वा व्याकरण नसलेली, लिखित स्वरूपात उपलब्ध नसलेली केवळ ही जमात 'पावरा' बोलीच म्हणून आजही ही भाषा जिवंत राहिली आहे. तत्कालिन निवासाचे संख्याप्रमाण कमी झाले, त्याचे कारण अतिक्रमण जमिनींच्या शोधार्थ पावरा जमातीचा हा समुदाय अन्य राज्यांमध्ये विखुरला गेल्याचे बुर्जूग सांगतात. जेव्हा पारतंत्र्य भारतावर स्वातंत्र्याचे जुजबी संकट गुजरले, गोऱ्यांनी आक्रमणाचा अखेरचा पवित्रा घेतला, तेव्हा या जमातीनेही मोठे योगदान दिल्याचे सांगितले जाते; पण त्याचा इतिहासात कुठे उल्लेख नाही किंवा तुरूंगवास भोगलेल्यांनी आपल्याला ब्रिटिशांनी जखडण्याची भाषा आजपर्यंत कबललेली नाही. दुसऱ्या महायुद्धादरम्यान इंदूर इलाख्यात पावरा जमातीच्या पुरूष-महिला मंडळींनी तिरकामठ्या, गोफणाच्या बळावर संघर्ष केल्याचे बुजूर्ग आजसुद्धा आठवतात. पाश्चात्य औषधी जरी असली, तरी आयुर्वेदाकडे आता जग वळले आहे. लोकांना त्याची महती पटत चालली आहे. मात्र, त्या वनस्पती जंगलात कुठे सापडतात? अनेकदा प्राचीन ग्रंथांमध्ये केवळ नावे दिली आहेत. पण, ती शोधून काढणे नव्या डॉक्टरांना शक्य होत नाही. पण, पावरा जमातीच्या ज्येष्ठ लोकांना आजही त्यासंबंधीची माहिती आहे.

## बारा कोसांवर बदलणारी भाषा

बखरकारांनी वर्णलेल्या इतिहासानुसार या जमातीची भाषा प्रत्येक बारा कोसांवर बदलत गेली. या जमातीची स्वतंत्र अशी लिपी नाही अगर संदर्भासाठी ग्रथे नाहीत, व्याकरण नाही की तशी पुस्तकेदेखील उपलब्ध नाहीत. त्यामुळे ऐकीव माहितीच्या आधारावर देवनागरी लिपीतच त्यांची भाषा अन् अन्य संदर्भ समाजासमोर मांडावे लागतात. स्वातंत्र्यसंग्रामात छलांग लगावलेल्यांची भाषा जरूर निराळी असावी; परंतु अलिकडल्या काळात तेदेखील हुतात्मे झाल्याची साधी दखल कुणी घेतली नसल्याचे शल्य उरलेली म्हातारी मंडळी आपल्या बोबडी (न कळणाऱ्या पावरी) भाषेत सांगताना त्यांच्या डोळ्यातून अश्रू ओघळत पाहताना पावरी भाषा समजणाऱ्यांच्या काळजात धस्स होते!

●●●

# भाषा शिक्षणाचा एकदा फसलेला प्रयोग

ही पार्श्वभूमी सांगण्याचे मुख्य कारण म्हणजे, या जमातीचा उद्‌गम अन् विकास कुठे झाला, यासाठी नसून या जमातीच्या आजही पहाडात पिढ्या घडविणाऱ्या सरकारी शिक्षकांना त्यांच्या भाषेची साधी ओळख असावी, असा आहे. कारण, १९९६ मधील तत्कालिन महाराष्ट्र शासनाने जेव्हा 'आदिभारती'च्या माध्यमातून आदिवासी विद्यार्थ्यांना त्यांच्याच बोलीभाषेतून शिक्षण देण्याच्या प्रायोगिक प्रयत्न केला, तेव्हा करोडोंचा शासकीय निधी निकामी गेला. 'आदिभारती'च्या मर्यादा (भिली पुस्तक) तेव्हाच्या शासनाने आपल्या अनभिज्ञ अध्ययनाद्वारे राज्य पुस्तक निर्मिती मंडळास प्रसिद्ध करण्याचा हुकूम केला, त्यावर पहिली हरकत माझी होती अन् ती 'रविवार सकाळ' वृत्तपत्रात (३० जून १९९६) प्रमुखपृष्ठावर अमर्यादित शब्दसंख्येत विशेष लेखाद्वारे प्रकाशित झाली. कारण, तो विषय गांभीर्याचा तसेच 'भाषेचा' होता. बारा कोसांच्या अंतरावर बदलणाऱ्या आदिवासांच्या भाषेविषयी 'आदिभारती'ची पुस्तक निर्मिती आदिवासी विद्यार्थ्यांना नेमक्या कोणत्या भाषेचे ज्ञान देणार? हा महत्वपूर्ण मुद्दा मांडण्यात आला नि् तत्कालिन शासनाचा तो प्रयोग भिंजत्या घोंगड्यातच राहिला. मूळ मुद्दा महाराष्ट्रात ठाणे, नंदुरबार, धुळे, वाशिम, गडचिरोली आदी जिल्ह्यांमध्ये कोणत्या भाषा प्रमुख आहे, याचा अभ्यास तेव्हाच्या अभ्यासकर्त्यांनी अन्यांवर सोपविल्यामुळे प्रयोग फसला. आदिवासींची भाषा रस्व, दीर्घ, अनुनासिक, अलंकारी अशा पद्धतीची जरी असली, तरी प्रत्येक बारा कोसांच्या अंतरावर ती गेली, याचा सारासार विचार अभ्यासकर्त्यांनी ढोबळमानाने केल्याचे निदर्शनास आले. महाराष्ट्रात विविध जाती-जमातींचे आदिवासी लोक राहतात. राज्यातील आदिवासी जमातीच्या अंदाजे लहान-मोठ्या ७४ बोलीभाषा आहेत. त्यापैकी धुळे व नंदुरबार जिल्ह्यात १५ ते २० भाषा सध्या वापरात आहेत, नव्हे अस्तित्वात आहेत, हे पुन्हा लिहणे नव्हे!

उदाहरण...

**'पाया पोडजे सरस्वती आया तारा ।**

**बुद्धी आप नाना-मोटाक ।**

**भुळा-बापडाक बुद्धी आप।**

**आखा मेळीन लेजे अक्कल।**

**लिखणे-वाचणे तू मोदत कोरतली।**

**शिकणेवाळाक तू सुकी राखतली।'**

(पाया पडतो आम्ही सरस्वती माते तुझ्या।

बुद्धी दे लहान-मोठ्यांना।

भोळ्या-भाबड्यांना दे बुद्धी।

सगळे मिळूनी घेऊ अक्कल।

लिहा-वाचायला तू मदत करते

शिकणाऱ्यांना तू सुखी ठेवते।... मराठी अनुवाद)

पावरी भाषा सहजा-सहजी कुणाला कळणारी नसली, तरी नंदुरबार जिल्ह्यात शहादा, धडगाव, तळोदा तालुक्यात काहीप्रमाणात बोलली जाते, मात्र त्यातदेखील फरक जाणवतो. कारण, बारा कोसांवर ही भाषा बदलत गेली आहे. ते प्रमाण आजसुद्धा आहे. धुळे जिल्ह्यात शिरपूर तालुका, जळगाव जिल्ह्याचा काही भाग, तापी किनारी अन् मध्य प्रदेश सीमेवर मोठ्या प्रमाणावर आवर्जून अस्तित्वात आहे.

●●●

# पावरा जमातीचा ‘गायणा’ अन् संदर्भ



पावरांचा जमातीचा ‘गायणा’ अन् ‘गरबा’चे विस्तृतीकरण द्यावयाचे झाल्यास पान्हांचा ओघ वाढेल, तरीही आटोपते घेण्याचा हा प्रयास आहे. ‘पावरा’ जमातीच्या जीवनात इतर सणा–समारंभाच्या गाण्यांना वगळता बोधात्मक गाण्यांनादेखील मानाचे स्थान आहे. अलिखित वाङ्मयाचा अभाव असल्याकारणाने त्यांची संस्कृती ही त्यांच्या पिढ्यान्‌पिढ्या चाललेल्या सणोत्सवांच्या गीतांच्या अन् कहाण्यांद्वारेच टिकून राहिलेली आहे. आदिवासी संस्कृती ही भारतातच नव्हे, तर जगाच्या इतिहासामध्येही आरंभाची आहे. ज्या ठिकाणी इतिहासाचे धागेदोरे जुळावण्यास पूर्णपणे पुरावे उपलब्ध नाहीत, त्या ठिकाणी आदिवासींच्या संस्कृतीवरूनच समजुतदारपणे जुळवाजुळव करता येते. सातपुड्याच्या डोंगरदऱ्यांत पावरा जमात कधीपासून वास्तव्य करून आहे, यास लिखित पुरावे नाहीत. पण, या जमातीत गुलाल्या बाजार, भोंगऱ्या मेळावा, होळी, वाघदेवपुजा, नवाय, गरबा, पोळा, चौदस, गाव–नवाड दिवाळी अन् इंदल आदी सणोत्सवांना अधिकाधिक महत्व आहे. त्याचप्रमाणे ‘गायणा’ (दिवासू) या त्यांच्या पूर्वापार चालत आलेल्या गाण्यांच्या आधारावर भरणाऱ्या अन् अलिकडे लोप पाऊ धजलेल्या अनोख्या निसर्गपूजक मैफलीला नव्या पिढीला माहिती नसावी. या गायणा प्रथेमधील बडवे (हल्ली अंधश्रद्धेला डावलून) अर्थात धार्मिक विधीत सतत उपयोगी पडणाऱ्या भगतांना मानाचे स्थान आहे.

बापजाद्यांच्या सांगण्यानुसार मागोवा असा सापडतो की, निसर्गाच्या कुशीतून निष्पन्नलेल्या नव्या हिरवळीचा आनंदाने स्वागत करण्यासाठी ‘गायणा’ मैफल मनविली जाते. पावसझडीचे दिवस लागले की, वाघदेवपूजनाचा सोहळा संपतो अन् डोंगरखोऱ्यात वास्तव्य करणाऱ्या या जमातीच्या बुजूर्ग मंडळींची मने नव्या हिरवळीने प्रफुल्लीत होतात. पावरा जमातीची बहुतेक लोकगीते निसर्गाच्या शिकवणीने, संकेताने गायलेली. धरित्रीच्या मातीच्या कणाकणांत लिहलेली. त्या पाठीमागे एक निराळी विचारधारा आहे. निसर्गानेच या जमातीला आध्यात्मिक, मानसिक अन् भावनिकबोध दिले आहेत. पूर्वजांच्या बोधानुसार त्यांची निसर्गपुजा प्रचलित आहे. त्यांच्या बोधकल्पना, नृत्य ते गायनातून गात असतात. दिवसभराच्या कामाच्या दगदगीतून थकल्यावरदेखील या जमातीमधील ज्येष्ठ मंडळी एखाद्याच्या पटांगणात अगर घरी जमतात अन्

'राणी रोणगाय' (एक लहानसे चर्मवाद्य अर्थात ढाक) गायणाच्या मैफलीत दंगून जातात. प्रारंभी त्यांच्यातला गीत गातो नि् त्याच्यामागून स्वरसाथी 'झेला' (साथी) गातात...

''हारेन् हारे हारे... ओ-ओ-ओ; हारेन् हारे हारे... हारेन जिवडा रुवेमोने,

मारी पायोमा रोणगाय... राणी रोणगायकाजोळे...''

(उपरोक्त दृष्टांत असा :''हारेन् हारे हारे...'' हा स्वरांकित जल्लोषमय निनाद आहे. पवित्र अभ्यंतराने परमेश्वराचरणी काहीतरी याचना करण्यास आम्ही सर्व येथे एकत्र जमलो आहोत. आमच्या प्रत्येकाच्या पायात एक छोटेसे वाद्य देवाच्या स्तुती गायनासाठी वाजवायला घेऊन बसलो आहोत.)

पुढे असाच धागा अतुटपणे वदत जातो. तो असा,

'' काळे भिं बोस्यां मालतू गायोणे; बारा झेला बोसीम्यां मालगू गायोणे,

नांबे-छेटीं वाते कोरे, मालगू गायोणे...''

(की, कोळोख्या धरणीचा आडोसा घेऊन बसलोय् आमच्यासमवेत मालगू गायोण अर्थात विशेष माहिती देणाराही अन् त्यासोबत उत्तमरित्या गाणे बाणारे बारा विद्यमानदेखील बसले आहेत. कारण, मलगू गायोण जुन्यापिढीच्या महत्वपूर्ण गाण्यांना प्रारंभ करणार आहेत, ते शांतचिंताने ऐका.)

पावरा जमातीत बोधपर गाण्यांनासुद्धा महत्वाचे स्थान आहे. त्यांच्या बोधपर लोकगीतांचे अध्ययन केल्याखेरीज त्यांच्या संस्कृतीचे जवळून दर्शन होणे अवघड आहे. कारण, तोच दाखला पायरी-पायरीने वाढत जातो.

'' निलछानो वानो गांवे राणी काजोळे, कोळ दिवू बाळे राणी काजोळे;

भरमुंडी मेले राणी, राणी काजोळे...''

येथे त्यांना असे सूचवावयाचे आहे, हिरवळीने आच्छादलेली वनराई (राणी काजोळे) गाते आहे नि् हीच हिरवीसृष्टि जगातला प्रकाश पेटवते आहे.

'' निंबू, सुपारी मेले राणी काजोळे... नोव्यार मेल देदा राणी काजोळे...

कुकडू-बुकडू मेल्या राणी काजोळे...''

'लिंबू, सुपारी, नारळ, कोबंडे-बोकड या अर्पण केल्या जाणाऱ्या भेटवस्तू हिरव्यागार भूमिवर ठेवत आहोत.' पावरा जमातीत अलिकडच्या काळात अंधश्रद्धा लोप होते आहे. मात्र, आगळ्या रुढी, परंपरा आजी जिवंत आहेत. सर्वसाधारणपणे निसर्गाच्या सहवासात राहात असल्यामुळे त्यांच्या जीवनात कळत-नकळत तादाम्य पावल्याचा प्रत्यय येतो.

''भुक्या-तिस्या दिनमां नारवी निवछा कुवरे; घिरी-घिरीन् रोडे...

आडखामां रोडी रोय... निवछा कुवरे...''

भुकेल्या-तहानलेल्या दिवसांत हिरवळलेली अवनी स्फूंदून-स्फूंदून रडायला लागली, कुठल्यातरी डोंगराआड...

''काय चिडो रोडे कोरीन आबू कुवमी देखणे लाग्यू,

दाहडकी कोरीन तारी आमु पूजा कारसू हियां झुणी हारे निवछा कुवरे''

कुठला पक्षी (हिरवीसृष्टि) रडते आहे. म्हणून आबू कुवमी (पावसझडी लावणारा मेघराया) बघायला लागला. पण, मेघराया तू हिंमत हरू नकोस. कारण, तुझी हिंमत खचली तर आमच्या भवितव्याचे काय होईल? आम्ही काबाळकष्ट करून तुझी पुजा करू.

''डोंगर आयू उदोमें आबा कुवमे...

सोना सोयरे नाहार गुंजारे आबा कुवमे...

माववा पुजारी लाया आबा कुवमे''

डोंगर आता संतापून आला आहे. कारण, रस्तयाकडल्या झुडपात राहणारा वाघ डरकाळ्या फोडत येरझारा घालतो आहे. त्याची अपशकुनी क्रिया थांबावी म्हणून आम्ही पुजन करणारे साहित्य, पुजारी आणला आहे.

पावरा जमात दऱ्याखोऱ्यांत, निसर्गाच्या कुशीत स्वत:ला सुरक्षित मानते. आधुनिक सुधारणांच्या विनाशकारी दुष्परिणांमांपासून आपली संस्कृती वेगळी ठेवते आहे. तिथली व्यक्ती निसर्गाच्या सगळ्या रूपांना आपलेपणाने स्वीकारते. अलिकडे शिक्षणाचा प्रवाह, शासकीय योजनांचा लाभ अन् दळणवळण व्यवस्था यातून शहरीकरणाशी त्यांचा संपर्क वाढला आहे. त्यामुळे त्यांच्यात बहुतांश सुधारणा अन् प्रगती झाल्याचे दिसून येते.

पावसझडीतल्या 'गरबा'चे संक्षप्तीकरण

भारतीय संस्कृतीत समाज पद्धतीनुसार नाचगाण्याचे नानाविध प्रकार आहेत. त्यापैकी आदिवासी पावरा जमातीत 'गरबा' नाचाला विशेश महत्व आहे. अर्थात पावसझडीचे दिवस लागले की, वाघदेवपूजनाची सांगता झाल्यावर या जमातीचा गरबा नाच सुरू होतो.

''गरबो पावोंने पातळ्यों की गरबो रोमे तारे लोल''

गुजरातच्या पावागड येथून पावरा जमातीच्या या नृत्याचा उगम झाल्याचा इतिहास आहे. उपरोक्त वाक्यात पाली भाषेचाही अर्थ आला आहे. 'गरबा नाच हा अतिनिर्मळ आहे. आता आपण त्याचा आनंद घेऊ या...'

''झिऱ्यू-मिऱ्यू पाणी पोडे, बाय मारी निववी नाडी भिगेवाँ''

पावसाची रिपरिप सुरू आहे, बहिण माझ्या निळ्या रंगाची नाटी (पावरी लुगडे) चिंबून निघते आहे.

''गरबो कुणीने दरबारीयों की गरबो रोमे तारे लोल,

गरबो भायाने दरबारीयों की गरबो रोमे तारे लोल''

हा गरबा कुणाच्या दरबारी रंगला आहे, तर आपल्या भावाच्या. आपण त्यास साद घालू या.

''भोगेवाने मेणोने धोरती बोणायू की, धोरती भोली खुली रे लोल''

परमेश्वराने मेणाची पृथ्वी बनविली, ती अत्यंत सुंदर आहे. असे जग पुन्हा मिळायचे नाही.

पुरातनापासून चालत आलेल्या या जमातीच्या गरबा नाच–गाण्यांचे अध्ययन केले असता काळासोबतच हा धागा भरारत राहतो. यावरून हे साध्य होते की, या जमातीजवळ जी संस्कृती जतन आहे, तितके ज्ञानही त्यांच्या पदरी आहे. सहजगत्या उच्चारता येणारी शब्दसंपत्ती हेच त्यांचे समृद्ध जगणे म्हणावे.

●●●



# होलिकोत्सव, गुलाल्या-भोंगऱ्या



महाराष्ट्रात सर्वाधिक आदिवासी खान्देशात आहेत. खान्देश डोंगराळभाग तसा आदिवासी निवासस्थानाचा. यात नानातऱ्हेच्या आदिवासी जाती-जमाती गुण्यागोविंदाने नांदताहेत. त्यांच्यापैकी 'पावरा' ही एक जमात. या जमातीचे बारा महिन्यातील आनंदोल्हासाचे 'दोन आठवडे' म्हणजे, गुलाल्या आणि भोंगऱ्या बाजाराचे.

चोहोबाजूस सातपुडा डोंगराच्या अभंग रांगा आणि सातपुडाच्या दऱ्याखोऱ्यात वसलेले आदिवासी खान्देश! अशात, आंग्रेस (महाराष्ट्र) व राजवाडा (मध्य प्रदेश) यांच्या सीमारेषा. अशातऱ्हेच्या भौगोलिक रचनेत आंग्रेसचे निमूळते शेपूट... संस्कृतीवर अल्पप्रमाणात हिंदी भाषेचा पगडा. दैनंदिन जीवन व्यवहाराच्या नजरेत खान्देश भाग अलिप्त. म्हणूनच यांचे जगणे पूर्णपणे जंगलावर. मात्र, माणुसकीची जाणीव! जंगलातील माती-झाडाशी एकरूप असलेल्या या आदिवासींनी आपापली संस्कृती जतनली आहे. आपल्या संस्कृतीमधील धनवानपणाची यांना जाणीव आहे. मातीचा रंग व सुगंध भिन्नभिन्न असल्याप्रमाणे प्रत्येक राज्यात, प्रत्येक प्रदेशात वा प्रत्येक भागात विविध संस्कृतीचे दर्शन घडते. आपापली संस्कृती आपल्याला प्रिय असते म्हणून ती यांच्या दररोजच्या कृतीतून, विशेषत: संगीत, नृत्य, गाणे, मेळाव्यातून आणि बाजारातून साकारते.

गुलाल्या बाजार

गुलाल्या बाजार म्हणजे आनंदाच्या प्रसंगी एकमेकांच्या अंगावर जो 'गुलाल' रंग उधळला जातो, फेकला जातो त्याचा बाजार. भोंगऱ्या मेळाव्याच्या एक आठवडा अगोदर असलेला बाजार अथवा होळी दिवसाच्या दोन आठवड्यांपूर्वी साजरा केला जाणारा बाजार म्हणजेच गुलाल्या बाजार. या गुलाल्या बाजारात भोंगऱ्या मेळाव्याचे 'स्वागत' केले जाते. त्या रंगात साठवून अवकळा आलेल्या, जीवन सरोवावरुन आशेचे शेवाळ पसरविलेल्या छोटुकल्यापासून तरूण-तरूणी, वृद्ध मंडळी या बाजारात सहभागी होऊन एकमेकांच्या अंगावर, गालावर गुलाल उधळून आनंद लुटतात. गुलाल्या बाजाराचा प्रमुख हेतू हा की, एकमेका-व्यक्तींची काये लालसर रंगवून, येणाऱ्या भोंगऱ्या मेळाव्याचे 'सुस्वागत' करणे. या गुलाल्या बाजाराला भोंगऱ्या मेळाव्याचे 'पूर्वप्रतिक' म्हणून महत्व आहे. हा

गुलाल्या सर्वत्र भरणाऱ्या आठवडे बाजारासारखा असतो. पण, या बाजारात जास्त करुन गुलाल रंगाची अधिक प्रमाणात उधळण होत असते. आदिवासी मंडळी हातात गुलाल घेवून एकमेकांच्या अंगावर, गालावर तो चोपडत असतात. सकाळी पुरा उमललेला गुलाब पाहिला की, मन कसे हरवून जाते! ताज्या टवटवीत पाकळ्यांवरील दवबिंदू पाहिले की, पापण्याच्या कडादेखील ओलावतात. पाकळी-पाकळीने उमलत जाणारा हा साक्षात्कार, कडक उन्हात उभा ठाकलेला सोसवत नाही. तसा आनंद एकमेकाला गुलाल लावून प्रत्येकजण लुटत असतात. हा बाजार एक आठवडापर्यंत ठिकठिकाणी साजरा होत असतो. मुख्यत्वे, हा बाजार ज्या-ज्या ठिकाणी भोंगऱ्या मेळावा भरविला जातो त्या-त्या ठिकाणीच साजरा होत असतो. यामागे जीवनाचे वलय चालूच असते. ते सुरु असले तरी ही आदिवासी माणसे या बाजारातून आनंदानंद हिरावतात. त्यांचे हे दिवस म्हणजे अक्षरश: स्वानंद कुशीत भिडवायचे. या बाजारात गुलाल उडविताना ओळखी-अपरिचीतांचा दुरावा नसतो. कुठल्याही व्यक्तीवर गुलाल उडविण्याचा हा सप्ताह असल्याने कोणीही-कुणावर उडवू शकतो. पण, गुलाल्या बाजार जेथे आज आहे तेथेच. त्या बाजारात जावूनच एक आठवडाभर हा बाजार फिरत्यावारी परंपरेनुसार होत असतो. उदाहरणार्थ :प्रत्येक आठवड्यात रविवारी कुठला बाजार भरतो? त्या ठिकाणीच! मंगळवारी-गुरुवारी-शनिवारी, असे क्रमवार. मग एकेदिवशी तीन गावचे बाजार का असू नये! तेथे एकेच दिवशी गुलाल्या बाजार असतो. म्हणजे त्या बाजारात जावूनच गुलाल उधळायचा. त्याप्रमाणे भोंगऱ्या मेळाव्यातही अशी पद्धत या जमातीच्या रिवाजानुसार असते.

खान्देशातील डोंगरदऱ्याच्या आदिवासी भागात महत्वाचे म्हणजे मध्य प्रदेश-गुजरात, राजस्थान, महाराष्ट्र तसेच इतरत्र, गुलाल्या बाजार भोंगऱ्या मेळावा साजरा करणे प्रमुख प्रमाणात 'पावरा' ही जमात पुढाकार घेते. आधुनिक काळापासून 'पावरा' जमातीत भारतीयातली ही संस्कृती दडपून बसली आहे. महाराष्ट्रात (खान्देशात) गुलाल्या बाजाराची आणि भोंगऱ्या मेळाव्याची सुरुवात ब्रिटीश राज्यकर्त्यांच्या काळात झाली असावी. त्यासमयी भोंगऱ्या मेळाव्यातला व गुलाल्या बाजाराला केवळ 'गुलाल्या' म्हणून ओळखले जात होते. त्यानंतर दोन भागात त्याची वाटणी झाली. एक गुलाल्या बाजार आणि त्याचा प्रमुखभाग भोंगऱ्या मेळावा. 'पावरा' जमातीमधील ही उत्सव पद्धत पुरातन काळापासून चालत आलेली असल्याचे बुर्जूग सांगतात.

गुलाल्या बाजाराचे एक वैशिष्ट्ये म्हणजे एखाद्या गावाला भोंगऱ्या मेळावा साजरा होतो त्याच दिवशी एक आठवडा अगोदर गुलाल्या बाजार भरविला गेला पाहिजे. अर्थात, जर 'अ' या गावात पुढच्या रविवारी भोंगऱ्या मेळावा साजरा होणार असेल, तर या रविवारी गुलाल्या बाजार भरविला गेला पाहिजे. हा बाजार भरुन झाला तरच भोंगऱ्या मेळावा भरवावा, अन्यथा 'पावरा' जमातीच्या रुढी-परंपरेनुसार भरवणेची समजूत अपशकुनी मानली जाते. दुसरे म्हणजे, गुलाल्या बाजारात 'गुलाल' एकमेकांना लावण्याआधी अथवा उडविण्याअगोदर प्रथमत: उद्घाटक म्हणून यांच्या जमातीमधील प्रमुखास मान दिला जातो. जर त्या प्रमुखाने आरंभाला गुलाल उडविला तरच इतरांना उधळविण्याची परवानगी दिली जाते. एखाद्याने गुलाल्या बाजाराचे गुलाल उडवून सर्वप्रथम प्रारंभ केला तर भांडण (झगडा) होण्याची शक्यता असते. हे झाले गुलाल्या बाजाराचे.

भोंगऱ्या मेळावा

'पावरा' जमातीत भोंगऱ्या मेळावा भरविण्याचा असा एक रिवाजच आहे की, 'आपापल्या भागातील शेतीची सर्व कामे संपल्यावर हा 'भोंगऱ्या मेळावा' होळीसाठी उत्सव म्हणून भरविण्यात



येतो. भोंगऱ्या मेळावा म्हणजे, होळीचा एक 'पूर्व उपभाग' होळीचे खाद्यपदार्थ खरेदी करण्यासाठी हा मेळावा आयोजिला जातो. ठिकठिकाणी यात्रा जशी क्रमक्रमाने असते, तशाच पद्धतीने भोंगऱ्या मेळावादेखील अनुक्रमे वेगवेगळ्या गावांमध्ये साजरा होत असतो. अर्थात, उपरोक्त गुलाल्या बाजाराच्या पद्धतीनुसार. बैलगाडीने अथवा टोळ्या-टोळ्याने भोंगऱ्या मेळाव्याला जाण्याचा जमाना आता राहिला नाही. कारण, दळणवळणाचे साधन झाले आहे.

हा मेळावा होळीच्या एक हप्ताअगोदर भरविला जातो. यात ररा जमातीची सर्व मंडळी नटून-थटून एकत्र जमते. सामूहिक नृत्य, स्वतंत्र नाच, पावरी बोलीतील गाणी आदी येथे बघावयास मिळते. वाद्य साहित्य म्हणजे ढोल, मांदोव (ढोलाचा एक लहान प्रकार), तोवी (विशिष्ट ताट), टुमकळी (ढोलकीचा प्रकार), खोवखिच्च्या, झांजऱ्या, भिर्ऱ्या आणि पावी वगैरे वस्तू रिंगणनृत्याच्यावेळी उपयोगी आणल्या जातात. नानातऱ्हेचे वाद्य, संगीत साहित्यांनी यांच्या मेळाव्याचा नाच-गाण्याचा कार्यक्रम रंगतो. संपूर्ण आदिवासी बंधू-भगिनी यात एकत्रित होतात व स्वत:च्या शोभत्या वेशभूषाने ते मेळाव्यात एकी, बंधूभाव, समता प्रिती आदी ऋणानुबंधाने भोंगऱ्या मेळाव्यात प्रेम प्रस्थापित करतात. दूरदूरचे, आसपासचे आदिवासी बांधव या मेळाव्यात सहभागी होण्यासाठी उत्सुकतेने येतात. तसेच होळीसाठी खाद्यपदार्थ घेतात.

गैरसमजूत

शहरी विभागात म्हणजे, ज्यांनी कोणी हा मेळावा पाहिलाही नाही वा ज्यांना या मेळाव्याचे दर्शनदेखील लाभलेले नाही, मात्र भोंगऱ्या मेळाव्याची पुरेशी माहिती नाही त्यांच्यात एक गैरसमज झाला आहे. 'लग्न करू पाहणारी तरूण मंडळी या मेळाव्यातून आपल्या पसंतीच्या तरूणींना पळवितात.'पण, तसा कुठलाही प्रकार या मेळाव्यात घडत नसतो. अन्य समाजात निर्माण झालेला हा एक निव्वळ गैरसमज आहे.

आपण जर (इतर सण वगळता) त्यांच्या गुलाल्या बाजार, भोंगऱ्या मेळावा पाहाल तर

सारे ते नवलच. काहीतरी वैशिष्ट्यपूर्ण वाटेल, भोंगऱ्या मेळाव्यात 'ढोल' (एक प्रकारचे मोठे चर्मवाद्य) घेऊन ते पारंपारिक पेहरावात सामूहिक नृत्य करण्यात दंग होतात. नाचणारे, गाणारे, वाद्य वाजविणारे, मस्करी करणारे, येरझारा घालणारे, बघणारे, नाचतात, गातात, वाजवितात. हा मेळावा त्यांच्या जीवनात वर्षातून एकदा येतो. म्हणून या मेळाव्यात पावरा मंडळी धम्माल उडवित असते. मेळाव्यात नाचताना तरूणी-महिला अलौकित, आकर्षित वस्त्रे परिधान करतात. पुरुषांचे मात्र विचित्रच असते हातात निरनिराळी हत्यारे ते नाचण्यात वापरतात. भोंगऱ्या मेळाव्यातून प्रारंभी जो ढोल फिरविला जातो तो फिरविणे म्हणजे, ज्या गावाचा मेळावा असेल त्या गावचाच ढोल फिरविण्याची प्रथा आहे. त्यानंतर बाहेरुन आलेल्या ढोलांना मेळाव्यातून स्पर्धा करण्याची परवानगी दिली जाते. अशातऱ्हेचा हा गुलाल्या बाजार-भोंगऱ्या मेळावा. वर्षातून एकदा येणारा दोन आठवडी उत्सवाची सांगता होळीच्या दिवशी भरल्या जाणाऱ्या भोंगऱ्या मेळाव्याने होते.

या जमातीमधील ही संस्कृती पूर्वापार त्यांच्या जीवनात कार्यान्वित आहे. मानवी संस्कृतीचा उगम आदिवासीत दिसून येतो. ते जरी डोंगऱ्यात वस्ती करीत असले तरी त्यांची संस्कृती शहरातील माणसांपेक्षा श्रेष्ठ ठरते. त्यांच्या संस्कृतीत जिवंतपणा आहे. आवेश, आपलेपणा, सहयोगिता, आदर यांचे प्रतिबिंब त्यांच्या कृतीत दिसते.

●●●

# विकासाच्या महापुरातही कोरडा पावरा?

आदिवासी समाजातील 'पावरा' जमातीच्या उत्थान आणि शिक्षणोन्नतीसंदर्भात गतिमानतेचे तुणतुणे जरी वाजवले जात असले, तरी ब्रिटिशांच्या जोखडमुक्तीनंतरही ही जमात आवश्यक तितकी प्रगत झालेली नाही, ही विदारता आहे. आदिवासींच्या विकासासाठी शासनामार्फत हर-साल करोडो रुपयांचा महापूर वाहवला जातो; तरीसुद्धा त्या महापुरात ही जमात आजही पुरती कोरडी आहे, ही भीषणता नाकारण्याजोगी खचितच नाही. या मूळ गाभ्याला शासन जबाबदार नाही की 'पावरा' जमातीचादेखील अपवाद नाही. स्वातंत्र्यानंतर घोषित योजनांच्या महाप्रलयात या जमातीचे खरेतर नंदनवन व्हायला हवे होते; परंतु तसे झालेले अजिबात दिसून येत नाही, हे नाकारून चालणार नाही.

शासनाचे धोरण आदिवासींना प्रगतीच्या प्रवाहात सामावून घेण्याचे आहे. असे असूनही विविध कल्याणकारी योजनांपासून 'पावरा' जमात अद्यापही उपेक्षित राहिली आहे. सरकारी कागदोपत्री या जमातीची तेव्हढी प्रगती दिसून येते त्याहून वास्तववादी दाहकता भयानक आहे. विकासापासून आजसुद्धा ही जमात कोसोदूर आहे. सरकारचे कागदी घोडे तेव्हढे विकासाच्या वल्गना करताना लुळे-पांगळे झाल्याचा वर्तमान भारतातल्या अनेक राज्यांमधील आदिवासींच्या हल्लीच्या जगण्याच्या दैनंदिन हलाखीतून दिसून येतो. आदिवासींसमोर उभी ठाकलेली आव्हाने आणि अविकासाचा गुंता अद्यापदेखील पुरेसा सोडवता आलेला नाही, ही बडी शोकांतिका आहे.

स्वातंत्र्यपूर्व भारतात राजसत्तेच्या हातून प्रशासनाच्या कार्याच्या अनुषंगाने जी काही विकासात्मक कार्ये इमाने-इतबारे पार पडली त्याचा भारतातल्या नागरी समाजाला काहीअंशी फायदा मिळत गेला. पण, पर्वतराजीवर, दऱ्याखोऱ्यांत आणि गिरीकंदरात राहणारी 'पावरा' जमात ही तर काहीअंशी आजही उपेक्षित आहे. त्याचे मुख्य कारण म्हणजे या जमातीकडे लक्ष देऊन प्रसंगोचित वस्तुस्थितीचे अध्ययन करण्यास सत्ताधारी आजदेखील असमर्थ ठरले आहेत. विकासप्रक्रियेत आवश्यक असलेले आदिवासींचे परिवर्तन अजूनही सर्वार्थाने झालेले दिसून येत नाही. विकासाची मिरसदारी सार्वजनिकरित्या जाहीर केली जाते. इथले सत्य म्हणजे सरकारच्या मार्गदर्शकतत्वांना तिलांजली दिली जाते. शासन अगर सरकार आपले कर्तव्य पारदर्शी तथा प्रामाणिकपणे पार पाडण्याच्या चाकोरीत असताना त्यातल्या दुव्यांना आदिवासींच्या झोपडीची फिकर नसते किंवा त्यांना पहाडातल्या जिंदगीशी काही देणे-घेणे नसते. त्यामुळेच सरकारी योजनांचा सातत्याने फियास्को होत असतो.

आदिवासींची संस्कृती संपूर्ण दुनियला ठाऊक आहे. रिवाज ही प्रथा काळानुरूप पूर्वापार निरनिराळी जरी असली तरी आज जो ज्वलंत सवाल आहे तो विकासाच्या महापुरातही कोरड्या असलेल्या आदिवासी समाजाचा. हा विषय दु:खकारक आहे. मुद्दे वा गुद्दे हेही आवश्यक किंवा अनावश्यक आहेत; मात्र संक्षिप्तपणे आदिवासी समाजाची वास्तवता मांडताना विस्तृतीकरण इथे ओघानेच टाळलेले बरे! समस्या, संघर्ष, आव्हाने ही भूमिका लांबपल्ल्याची आहे. पण, आदिवासींसाठीच्या विकासात शिक्षणाची नूतन कवाडे शासनाने उघडलेली असूनसुद्धा नव्या आव्हानांना सामोरे जाण्याची स्थिती निर्माण झालेली आहे. जगाला वाटते अगर वेगळा समज असाही आहे की, हा समाज शिक्षणाच्या प्रवाहात एकनिष्ठ झाला आहे; मात्र मुळात हा नुसता गैरसमज आहे. मग, तो सरकारदप्तरी सैर असो. खऱ्याअर्थाने आदिवासी समाज आजदेखील पूर्णपणे सुशिक्षित झालेला नाही. शिक्षणाच्या प्राप्त झालेल्या आकडेवारीवरून सरकारला वाटते

की, आपण या समाजाचे आजपर्यंत कल्याणच करत आलो आहोत; परंतु स्थिती त्याहून निराळी आहे. या समाजातल्या मूठभर प्रगत प्रतिनिधींना भान नाही, ते आपल्याच राजकारणात मश्गूल आहेत. सरकारी फतवा निघाला की, निव्वळ फोटोसेशनचा पुरावा सरकारदरबारी पेश करावा आणि आपली कर्तबगारी त्याद्वारे फुशारकीने प्रदर्शित करावी. आदिवासींच्या विकासासाठी प्रत्येक वर्षी कोट्यवधींच्या निधीची तरतूद करणाऱ्या सरकारला सत्याची जाणीव नसल्याची संवेदना जेव्हा पहाडपट्टीतल्या आदिवासींच्या चुलीपावेतो भिडते त्यावेळी निधीचा इंतजार करणाऱ्या त्यांच्या चुलींमधले विस्तव पेटण्याऐवजी निव्वळ धूर फेकत असते, ही तोहमतता निधी घोषणकर्त्यांना अजूनसुद्धा ठाऊक नाही. आदिवासी समाज आजदेखील अज्ञानाच्या आणि दारिद्र्याच्या खाईत झोकांड्या खातो आहे. अतिशयोक्ती म्हणजे सरकार या समाजाचे जरी भले करू इच्छित असले, तरी मधली यंत्रणा मग त्यात येणारे प्रवाह वेगवेगळ्या दिशेने वाहत असल्यामुळे अखेर रोष व्यक्त होतो तो सरकारवरच!

भारतात अशी कैक उदाहरणे आहेत की, दीर्घ संघर्षानंतरही आजमितीस त्यांचा निपटारा होऊ शकलेला नाही. अशा उदाहरणांच्या खोलात जायला घाई होईल; परंतु हा सर्व गोंधळ चालला आहे तो फक्त आदिवासींच्या विनाशाच्या इराद्यानेच, असाच एकूण समज आहे. आदिवासी पहाडांमध्ये सरकारच्या विविध विकासकामांत जे करोडोंचे घोटाळे बाहेर येतात, त्याच्यातून आदिवासींची प्रगती होत असल्याचे गृहित धरावयाचे काय? शासनाकडून आदिवासींसाठी जी साधनसामग्री पुरविली जाते त्याचा दर्जा कोणत्या स्वरूपाचा असतो? ज्या सुख-सुविधा उपलब्ध करून दिल्या जातात त्या कितपत सुरक्षित आणि योग्य असतात? खरेतर आदिवासींसाठीच्या विकासनिधीचा पुरेपूर विनियोग होतो काय? की सरकारदप्तरी नुसते कागदी घोडे नाचवले जातात? निवडणुका जवळ आल्या की आदिवासी आणि त्यांच्या प्रगतीप्रती सर्वांनाच पुळका येतो. पाच वर्षे ढुंकूनही न पाहणाऱ्यांना आदिवासींच्या मतांचे स्मरण होते. निवडणुका जिंकल्या की विजयांधांना पुन्हा विसर पडतो. विस्मृतीच्या गर्तेत ते आपल्याच नेहमीच्या करतुतीत मग्न होतात. अशा दशेत आदिवासींचा विकास होईल तो कसा? आदिवासींच्या विकासाचे वारे नावापुरते वर्षानुवर्षे पहाडातच घोंघावत असतील, तर ते थोपवणार कोण? प्रगती नामक त्यांची माय आतापर्यंत त्या घोंघावत्या वाऱ्यात वाहून निघाली नसेल काय? या समाजात जी काही बोटावर मोजण्याइतकी सुशिक्षित मंडळी आहे, त्यांची तुलना अन्य उपेक्षित व अप्रगत आदिवासींशी करणे अयोग्य आहे. विकासाची विचारधारा एकनिष्ठ असावी लागते. आदिवासी समाजाप्रमाणेच इतर समाजातसुद्धा दुर्लक्षित आणि अप्रगत घटक आहेत. तिथेदेखील प्रगतीची गंगा अद्यापपावेतो हव्या त्या प्रमाणात पोहचलेली नाही. त्यालाही विविध कारणे आहेत. खरी कारणमिमांसा जाणून घ्यायची हल्ली बहुतेकांची मानसिकता नसल्याने प्रगती दिशाहीन बनली आहे.

संघर्ष राजकीय असो, सामाजिक, शैक्षणिक, प्रागतिक किंवा उद्धारिक; पण स्वार्थासाठी कुठला आत्मा कुणाला पुकारतो आणि आदिवासींच्या नावाखाली फुत्कारणारा विकासाचा नाग तात्पुरता फुंकारतो व नंतर शंकेचे निराकरण झाले ना झाले की तो शांतपणे बिळात शिरून शिरजोर बनतो, असलाच काहीसा प्रकार आदिवासींबाबत चालला आहे. वास्तवता, आकडेवारी, समस्या अगर प्रगती ही तर स्वातंत्र्यानंतरही मैलोदूरच्या आदिवासींची पहाड बनली

आहे. जिथे अन्यायाची, बेईमानीची दरी या समाजाला आजही प्रत्यक्षपणे ओलांडता आलेली नाही, तिथे विकास नावाच्या मातेची बातच न्यारी आहे. आदिवासी समाजाच्या प्रगतीची आजपर्यंत वल्गना करण्यात येते आहे. मग सत्ताधारी–विरोधी किंवा तथाकथित समाजधुरिणींकडून असो. खऱ्या दुर्लक्षित आदिवासींच्या झोपडीतल्या चुलीपावेतो डोकावल्यास सच्चाई नेमकी कुठे आणि का रडते–सडते आहे, याची प्रचिती समक्ष साक्ष देऊन जाईल. सर्वमान्य–सर्वसामान्य हा जरी आदिवासींचा मुलभूत अधिकार असला तरी त्याची प्रामाणिकपणे अंमलबजावणी झालेली नाही. प्रत्यक्ष त्याची पूर्तता सरकारला सर्वत्र दिसून येणार नाही. केवळ इतरांच्या विश्वासावर सत्तातख्तावर बसून कपोलकल्पित अहवाल चाचपण्याऐवजी केंद्राच्या विश्वासू, प्रामाणिक प्रतिनिधींनी भारतातल्या दुर्गम–अतिदुर्गम उपेक्षित आदिवासींच्या झोपड्या झामलल्यास किंवा झोपड्यांमध्ये डोकावल्यास डोळ्यांमधून निघणाऱ्या आसवांच्या महापुराला आधार देणारा विकासाचा महाबंधारा हवा असल्याचे प्रकर्षाने जाणवून येईल. जगण्यासाठीचा आदिवासींचा संघर्ष, त्यांच्यापुढची नवी आव्हाने, प्रगतीच्या प्रवाहात आणण्याची सरकारची सालाबादाची शिकस्त, समस्यांच्या निराकरणाची आश्वासने, वेगवेगळ्या सवलतींच्या शिफारशी, संभाव्य धोके, जमिनींचा पाढा, पुनर्वसनाचा तिढा, कायदा आणि न्याय, शिक्षणाचे तुणतुणे, मरणाच्या खाईतून काढण्याची कुपोषणाची सलाईन शिवाय संस्कृती यासंदर्भात केंद्र अगर संबंधित राज्य सरकारांनी साकल्याने अभ्यास केल्यास दरवर्षी अर्थसंकल्पात जेव्हढी तरतूद केली जाते, ती निव्वळ आकडेफुगीची बिमारी असल्याचा भास होतो. आदिवासी लोकप्रतिनिधी समाजाला प्रगतीच्या प्रवाहात आणण्यासाठी आजसुद्धा सक्षमपणे जागृत नसल्याचे विदारक चित्र अनेक ठिकाणी दिसून येते. फक्त देखावा केला जातो तो समाजसेवेच्या नावाने आपमतलबीपणाचा. आपण समाजाप्रती उपकार करीत आहोत, असा होरा या समाजातील काही प्रगत लोकप्रतिनिधी–कार्यकर्त्यांकडून मिरवला जातो, हेसुद्धा उपेक्षित–दुर्लक्षित आदिवासींसाठी दुर्दैवच आहे.

●●●

# पावरा बोलीत अनुवादित बालगीते

बालकांना मातृभाषेतून शिक्षण मिळणे अगत्याचे आहे. भारतीय राज्य घटनेच्या कलम ३५० 'अ' मध्ये नमूद केल्याप्रमाणे सर्व अल्पसंख्याक समूहांच्या मुला-मुलींना प्राथमिक शिक्षण त्यांच्या मातृभाषेतून मिळायले हवे. खरे तर, आदिवासी पावरा मुलांना त्यांच्या मातृभाषेतून शिक्षण द्यायचे झाल्यास त्यांना शिकविणाऱ्या शिक्षकांनाही ती भाषा अवगत असली पाहिजे. आज आदिवासी पावरा क्षेत्रात काम करणारे सर्व शिक्षक ज्या-त्या भागातील आदिवासी भाषा बोलू शकतात असे मात्र नाही. ज्यांना ती भाषा येत नाही त्यांनी ती शिकून त्यावर प्रभुत्व मिळवायला हवे, त्याशिवाय त्यांना त्या भाषेतून प्रभावीपणे शिकवता येणार नाही. 'सर्वांसाठी शिक्षण' हे जरी आमल्या देशाचे धेय्यधोरण असले तरी आदिवासी पावरा मुलांसाठी खास त्यांच्या बोलीत असलेली, त्यांची भावविश्वे जपणारी बालगीते अजूनही उपलब्ध नाहीत. बालवयात फक्त घरातच असणारे मूल एक दिवस शाळेत जाऊ लागते. या संक्रमणावस्थेत त्याला त्याच्या परिचयाच्या भाषेतल्या बालसाहित्याची गजर भासू असते. मराठी बालसाहित्यात ज्या काही सुविख्यात साहित्यिकांची बालगीते गाजली, त्यातील मोजक्या मात्र पावरा बोलीभाषेच्या अभ्यासक्रमात उपयोगी पडू शकतील, अशा अनुवादित (पावरा) बालकविता पुढे अशा :

१. ओंजाणला आमु (अजाण आम्ही)

ओंजाणला आमु तारा पुरिया; तू आखाने बास,
मोंगसे तुसे वोंदजे, गावजे तारा भोलाईन चास ।।धृ।।
दाहडूचांद ये ताराच भोगेवान; तारा ढुरे केवडा,
ताराच खेते, दोरिया, पाणी, फोवे-फुले बोयडा.।।१।।
खुप नावे तुसे; तारा रे दोसधोडोन घोरे,
कोरिस भोगवान सारकीच तू गियाने आखापोरे.।।२।।
खूप शिकणो; काम कोरणो; मोंग धोरनो मोनोम,
होऊस ओतरी पुराव भोगवान, यीत एक जोसोम.।।३।।

-संजीवनी मराठे

२. नानलो (लहान गोष्टी)

इडीक-इडीक बालवाडीम
इडाक-इडाक खेल छे.
इडूक चांद-इडाक तारा
इडीक-इडीक रात छे.।।धृ।।
इडाक पुरिया-इडाक छिदा
इडीक जागे उडिरोया,
इडाक किडावा-इडीक लायनोम
इडाक पुरवडा लिजायरोया.।।१।।

खोरीत पुरिया इडाक छे

इडीक बालवाडी वारु छे,

टेम जो मोटो देखाडली छे

खुब इडीक एक घोडी छे.।।२।।

– नरेश रावताला

३. आकडान गीत (अंक गीत)

एक–दोन–तीन–चार...

आज छे सोमवार.

पाच–सहा–सात–आठ...

गुरुजी आकडा लेसेपाट.

नऊ–दहा–अकरा–बारा...

छिंदरा धुया नी मारा.

तेरा–चौदा–पंधरा–सोळा...

साळाम पुरिया छे थुळा.

सतरा–अठरा–एकोणीस–वीस...

सौंदारे सेववाम् छाटू उठीस.

– नरेश रावताला

४. एस. टी. आवी (झुक झुक गाडी)

एस.टी. आवी, एस.टी. आवी

हुंय् हुंय् हुंय.

भोंगू कोसू वाजे देखू

पौंक् पौंक् पौंक्.

तिकीट जुगू पौशा निकावू

छन् छन् छन्.

गाडीन घोंटी वाजे

टिंन् टिंन् टिंन्.

जाणे काय दूर कां

भूर भूर भूर.

कांबी जासू लिजायचां

दूर दूर दूर.

गाडीमा बोसू चालू

पट् पट् पट्.

गाडी हिमी निकवीच

हुंय् हुंय् हुंय्.

– वि. म. कुलकर्णी

५. डेडकूदादू (बेडूकदादा)

मे छे डेटकूदादू

पुछे काहा मारु वादू,

काय कोहो आपणूक नाव

वात मारी डरांव–डरांव्.।।धृ।।

घोर मारो पाणीमाईन

इनखरलोच नांबे छेहेन,

सुवतलू मे वारु बाकीन्

काम कोरतलू कुदी–कुदीन्.।।१।।

साती मारा माछा केकडा

खूपखूप छे भुळा–बापडा,

घोरोम मारा चार खुरिया

मे एने मारी लाडी पुरिया.।।२।।

– नरेश रावताला

६. फुंदीबाईन् कुकडू (आला माझ्या घरी)

फुंदीबाईन् कुकडू आयु मारे झोपले

खावाडीस कोंडू पियाडीस पाणी.

फुंदीबाईन् बुकडी आवी मारे झोपले

खावाडीस पाला पियाडीस पाणी.

फुंदीबाईन् बुईल आयु मारे झोपले

खावाडीस चारु पियाडीस पाणी.

फुंदीबाईन् बावो आयो मारे घोर

खावाडीस सिरो पियाडीस पाणी.

– अनुताई वाघ

७. पाणी बाबा आव आव (पाणीबाबा ये ये)

पाणी बाबा आव आव

काकडा–बुटा लाव लाव. ।।धृ।।

हाडगू कोहे कांव कांव

डेटको कोहे डरांव डरांव.।।१।।

मांजरो कोहे मांव मांव

टिटवी कोहे टिटीव् टिव.।।२।।

खालटी कोहे चिव् चिव्

पाणी आवे छोव छोव.।।३।।

– म. ज. रोहिणीकर

८. आवू पुरिया (या बाळांनो, या रे या)

आवू पुरिया आवूरे आवू

दोवडीन आखा छाटा आवू.

मोजा कोरु रे! मोजा मोरु

आजून दाहडू सोमजु तुमरु.

मोंगसे आखा सोमाईन रोहू

नोवली धोरती देखाडीस मे,

इने बोयडे लागीन आवू

घाटावी यी दिसरी दुनिया.

जां देखे चां फुले–फोवे

गोंद आवे एने बोयडा गोंवे,

ती कामे नाखीन आवू

आवीन देखू यी नोवली दुनिया.

– भा. रा. तांबे

९. घिंचडीबाय् (चिमणी)

घिंचडीबाय् घिंचडीबाय्

कां जाणेन ओतरी उतवाय्?

पिलांकोरता आंगणामाईन

दाणा आखा जोमाडलाय.

घिंचडीबाय् घिंचडीबाय्

कोसलो तारो घोर?

कोचरान तोळे

कोपसोन गादीपोर.

घिंचडीबाय् घिंचडीबाय्

तुमरे घोर कुण-कुण?

राजा-राणी आमु दुय.

– वामन निंबाळकर

१०. गांडो गिदल्यो (वेडं कोकरू)

गांडो गिदल्यो खुपे थाकीग्यो

घोर आपणेन टेमे वाटे  चुकीग्यो.

आंदारो देखीन आपसो घाबरीग्यो

थाकी-थाकीन् सुवणे लाग्यो.

ओळतेन तिनाक घोर जोडीग्यो

गांडो गिदल्यो आपसो हासीग्यो.

ओळतेन तिनाक घोर जोडीग्यो

गांडो गिदल्यो आपसो हासीग्यो.

खोळान गादीपोर मुंडको मेकीग्यो

धिरेच आयान खुमाळ सुयिग्यो.

– मंगेश पाडगावकर

११. काकळी काकळी सोप (गोरी गोरीपान)

काकळी काकळी सोप, देखायणेम घाटाव

दादा मेसेक एक भावी लाव.।।धृ।।

काकळीसोप भाबीक खोळोन नाटी

खोळोन नाटीकाजे धुवाने पाटी-(२)

धुवाने पाटीक गुबरोन घेराव....

भाबीक लावणे पेरेकलान गाडी

पेरेकलान गाडीक उंदराने जुडी -(२)

उंदरान जुडी चेंदरे कापसोन भाव...

– ग. दि. माडगूळकर

१२.धुमधाम (मजाच मजा)

मेते निसती धुमधाम कोरो।।धृ।।

गाडीने चाकटो बाबू घोडे

लाकडाके रोंदू दादू मारे

घोरोने उटलू बाय झाडे

घोरोमा आया मारी रूटा कोरे

मेते निसतू रूटा चोरो....

कुकडाके दाणा, बाबू घाले

ढुरे लिजाणे दादू लाकूड हेरे

बुकडाके पाणी बाय मेले

आंगणामा आया मारी कोचरु बाहरे

मेते निसतू यां-वां फिरो....

खेतोमा होळ बाबू गेरे

ढुरे बांदे दादू चारे

कोचरु खिल्लिम बाय सुहरे

खेतोमा आया मारी पुंजा भोरे

मेते निसतू कामोक डोरो....

– म. ज. रोहिणीकर

१३. कोमाय (पीक)

गाय-गाय दूध आप

दूध आपी पिलाकाजे.

पिला-पिला ताकद आप

ताकद आपी होळकाजे.

होळ-होळ फाड दे

फाड देदू धोरती काजे.

धोरती -धोरती कस आप

कस आपी कोणसो काजे.

कोणीस–कोणीस दाणा आप

पुस–पुस भोरीन आप.

– राजा मंगळवेढेकर

१४. कोहे (गवताचं पातं)

खोडोन पालू होवामा डुले

डुलिने कोहे, खेलने चालू.

झोरोमाईन पाणी खोवखोव हासे

हासिने कोहे, दोवडणे चालू.

निवो–निवो चिल्लो आंबापोर गावे

गाविने कोहे, नाचणे चालू.

मुसवधार पाणीम गारा पोडे

पोडीन कोहे, उचलणे चालू.

नानलू कुत्रू डुकायकुकडी खेले

दौवडीन कोहे, छिमणे चालू.

मांजरीन पिलो पाये थाबाये

थाबायीन् कोहे, खाणे चालू.

– वि. वा. शिरवाडकर

१५. मांजरान पिला (माऊची पिल्लं)

मांजरीन खुळाम

सुयीरोया काय?

नानला–नानला

पिला दुय!

मिच् मिच् डुळा

तिखला कान,

माणसोन तोसी

मिछान सान.

मांजरीन पिला

बिहतला किनी,

आयान खुळामगोथा

निकवतला नी.

– आशा गवाणकर

१६. फुंदान खेल (खेळ)

आपडी की थापडी तेरे लोटके

भाबी तारा चोटलामा फुंदू लोटके.।।धृ।।

फुंदू लोटकीन भाबीक कोहे

भाबी रिसवाईन फुंदाक झोटके।।१।।

फुंदू नेचे पोडीन कुदणे लागे

कुदीन–कुदीन चू आपसू मोटके.।।२।।

थाक आवे तोतिया बोसणे जाय

बोसीन किदरायू ती चोटलाम चोटके.।।३।।

– म. ज. रोहिणीकर

१७. आवरे आवरे पाणी (ये रे ये रे पावसा)

आवरे आवरे पाणी

तझे कोहो काहाणी

काहणी होयी झुटी

पाणी होयू खुटी.

पाणी पाडे तिड् तिड्

आंगणो होये किचीड् किचीड्

पाणी आयू मुसवधार

बोयडा होये निवागार.

●●●